केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातील आदिवासी उपयोजनेकरीता (TSP) ६० टक्के केंद्र हिश्श्यापोटी २२१०F७३८ या लेखाशिर्षाखाली रू.३९०३.०० लक्ष व ४० टक्के राज्य हिश्श्यापोटी २२१०E४५५ या लेखाशिर्षाखाली रू.२६०२.०० लक्ष अनुदान सन २०२३-२४ च्या तरतुदीतून वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बियुडी-१३२३/प्र.क्र.२७३/आरोग्य-७**
१० वा मजला , गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१.
दिनांक : ११ जुलै, २०२३

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३.
२) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/एफएमजी/कें.रा.हि./२४२३९-२४५/२०२३-२४, दिनांक २५.०५.२०२३.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०५/का-६, दिनांक २७.०६.२०२३.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०५/का-६, दिनांक ०७.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता आदिवासी उपयोजनेसाठी (TSP) सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून केंद्र हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची

बाब शासनाच्या विचाराधीन होती. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ अर्थसंकल्पिय तरतूद ४०% राज्य हिस्सा | वितरीत राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|
| A | शा.नि.क्र.बियुडी-१३२३/प्र.क्र.२२७ /आरोग्य-७, दि. २०.०६.२०२३ | २२१०E४५५ | १००००.०० | ७६.१५ |
| | शा.नि.क्र.बियुडी-१३२३/प्र.क्र.२७१ /आरोग्य-७,दि. २०.०६.२०२३ | | | ८२१.१९ |
| B | **एकूण वितरीत अनुदान -:** | | | ८९७.३४ |
| C | **वितरणासाठी उपलब्ध तरतूद** | | | ९१०२.६६ |

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता आदिवासी उपयोजनेतून (TSP) केंद्र व राज्य हिस्सा वितरीत करण्याकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात केंद्र हिस्सा लेखाशिर्ष २२१०F७३८ खाली रु.१७२४९.३५ लक्ष तसेच राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१०E४५५ खाली रु.१००००.०० लक्ष एवढी तरतुद अर्थसंकल्पित केलेली आहे. त्यातुन राज्य हिश्श्याचे दिनांक २०.०६.२०२३ च्या शासन निर्णयान्वये Kind Grant चे रु. ७६.१५ लक्ष व I & M चे रु. ८२१.१९ लक्ष असे एकूण रु.८९७.३४ लक्ष वितरीत करण्यात आले असून रु.९१०२.६६ लक्ष इतकी राज्य हिश्श्याची तरतूद शिल्लक आहे. सबब, सदर तरतुदीतून ६०% केंद्र हिश्श्यातील रु.३९०३.०० लक्ष व ४० राज्य हिश्श्यातील रु.२६०२.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी

यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

(रु.लाखात)

| अ. क्र. | तपशील | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत करावयाची तरतुद |
|---|---|---|---|---|
| १ | आदिवासी विकास विभाग मागणी क्र.टी-५, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०४) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान राज्य आरोग्य संस्थाना सहाय्यक अनुदान (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०F७३८ | १७२४९.३५ | ३९०३.०० |
| २ | आदिवासी विकास विभाग मागणी क्र.टी-५, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१६) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान राज्य आरोग्य संस्थाना सहाय्यक अनुदान (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०E४५५ | १००००.०० | २६०२.०० |

४. वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

६. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

८. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय, आदिवासी विकास विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. २८८/का-६, दि.२७.०६.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५९८/२३/व्यय-१४, दिनांक

२१.०६.२०२३ व क्रमांक ५९८/२०२३/व्यय-१४, दिनांक ०५.०७.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२७२०१२२८०७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.07.11 16:15:36 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणॆ
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग/ अर्थसंकल्प व व्यय-१४ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
१०. आदिवासी विकास विभाग/ कार्यासन-६, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२. निवडनस्ती ( आरोग्य -७) .